**ईज ऑफ डुईंग बिजनेस या केंद्र शासनाच्या धोरणाच्या अनुषंगाने बृहन्मुंबई कार्यक्षेत्राचा आढावा घेताना मा. मुख्य सचिव यांच्या अध्यक्षते खालील बैठकीत बांधकाम क्षेत्राबाबत घेण्यात आलेला निर्णय.**

**महाराष्ट्र शासन**
**उद्योग, ऊर्जा व कामगार विभाग**
**शासन परिपत्रक क्रमांक: इबांका-२०१९/प्र.क्र.९/काम-७**
हुतात्मा राजगुरु चौक, मादाम कामा रोड,
मंत्रालय, मुंबई- ४०० ०३२
दिनांक: १८ जानेवारी, २०१९.

<u>वाचा</u>:- १. इमारत व इतर बांधकाम कामगार (रोजगार नियमन व सेवाशर्ती) अधिनियम, १९९६.
२. इमारत व इतर बांधकाम कामगार (रोजगार नियमन व सेवाशर्ती) नियम, २००७.
३.नगर विकास विभागाचे क्र.टिपीबी ४३१९/०१/नवि-११ दि. १५ जानेवारी २०१९ चे पत्र.

**शासन परिपत्रक:-**

संदर्भाधीन अधिनियम कलम ४६ व नियम ५२ प्रमाणे प्रत्येक नियोक्ता त्याच्या नियंत्रणाखालील कोणत्याही इमारतीचे किंवा इतर बांधकाम सुरू करण्याच्या किमान ३० दिवसापुर्वी, प्रत्यक्ष बांधकाम सुरू करण्याचा दिनांक आणि बांधकाम पुर्ण होण्याचा संभाव्य दिनांक आणि अशा इमारतीचा किंवा इतर बांधकामाशी संबंधीत असे इतर तपशील या नियमांना जोडलेल्या नमुना ४ मध्ये एक <u>लेखी नोटीस</u> अधिकारीता असलेल्या निरीक्षकास पाठविल किंवा पाठविण्याची व्यवस्था करेल अशी तरतुद आहे.

२. बृहन्मुंबई महानगरपालिका कार्यक्षेत्रासाठी विकसीत केलेल्या Online Building Plan Sanction (OBPS) संगणक प्रणालीमधील सर्वसामान्य अर्जामध्ये {Common Application Form (CAF) }कोणत्याही इमारतीचे किंवा इतर बांधकाम सुरू करण्याची अंदाजे तारीख दर्शवण्यात येणार आहे. त्यामुळे कोणत्याही इमारतीचे किंवा इतर बांधकाम सुरू करण्याची नोटीस ही सर्वसामान्य अर्जाचा {Common Application Form (CAF) }एक भाग आहे. त्यामुळे यापुढे संदर्भाधीन नियम ५२ मधील नमुना ४ अन्वये प्रत्येक नियोक्त्यास एक लेखी नोटीस अधिकारीता असलेल्या निरीक्षकास पाठविणे किंवा पाठविण्याची व्यवस्था करणे आवश्यक नाही.

३. सबब, कामगार विभागाच्या सर्व संबंधित क्षेत्रीय सरकारी कामगार अधिकारी तथा निरीक्षक यांना बृहन्मुंबई महानगरपालिकेच्या ऑनलाईन संगणक प्रणालीद्वारे बांधकाम सुरू झाल्याची व बांधकाम पुर्ण झाल्याची माहिती बृहन्मुंबई महानगरपालिकेने वेळोवेळी उपलब्ध करुन द्यावी. जेणेकरुन संबंधित नियोक्त्यास वेगळयाने मागणी करावी लागणार नाही.

सदर शासन परिपत्रक महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आले असून त्याचा संकेतांक क्र. २०१९०११८१३२००२५५१० असा आहे. हे परिपत्रक डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

Dattatray Yashavant Dange

Digitally signed by Dattatray Yashavant Dange
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Industry Energy and Labour Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=3c4a5d20ce4512a723bac8053df84ea0ea108f23b43a8606745578799165dda6, serialNumber=5283972283258745ec605d4fba0d1097538a3cdff41156100a443a5ced8c79cf, cn=Dattatray Yashavant Dange
Date: 2019.01.18 13:25:02 +05'30'

**( दत्तात्रय यशवंत डांगे )**
कक्ष अधिकारी, महाराष्ट्र राज्य

**प्रत:-**

१) मा.राज्यपाल यांचे सचिव.
२) मा.मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव,मंत्रालय,मुंबई ४०० ०३२

३) मा.विरोधी पक्ष नेता,विधानसभा/विधान परिषद
४) मा.मंत्री (कामगार) यांचे खाजगी सचिव मंत्रालय,मुंबई ४०० ०३२
५) मा.राज्यमंत्री (कामगार) खाजगी सचिव मंत्रालय,मुंबई ४०० ०३२
६) सर्व सन्मानीय संसद सदस्य / विधानसभा सदस्य/ विधानपरिषद सदस्य.
७) प्रधान सचिव (कामगार) यांचे स्वीय सहायक
८) प्रधान सचिव (नगर विकास-१) यांचे स्वीय सहायक
९) प्रधान सचिव (नगर विकास-२)यांचे स्वीय सहायक
१०) अध्यक्ष,महाराष्ट्र इमारत व इतर बांधकाम कामगार कल्याणकारी मंडळ, मुंबई.
११) कामगार आयुक्त,महाराष्ट्र राज्य मुंबई.
१२) सर्व सदस्य,महाराष्ट्र इमारत व इतर बांधकाम कामगार कल्याणकारी मंडळ, मुंबई.
१३) उपसचिव (कामगार) ,उद्योग ,ऊर्जा व कामगार विभाग, मंत्रालय,मुंबई ४०० ०३२
१४) सर्व अपर कामगार आयुक्त / उपायुक्त कामगार कामगार आयुक्तालय मुंबई.
१५) निवड नस्ती (कामगार-७).